**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) सन २०१४-१५ अतंर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास (RAD) घटक राज्यात राबविण्यासाठी रु.१५.०० कोटी निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: शाशेअ-२०१४/प्र.क्र.१६५/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २० फेब्रुवारी, २०१५

**वाचा**

१. **शासन निर्णय क्र: शाशेअ-२०१४/प्र.क्र.१६३/४अे, दिनांक १ जूलै, २०१४**
२. **केंद्र शासनाचे पत्र क्र. १-७/२०१४-RFS-III दिनांक १६ जून, २०१४**
३. **केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.**
४. **शासन निर्णय क्र: शाशेअ-२०१४/प्र.क्र.१६५/४अे, दिनांक २७ जुलै, २०१४**
५. **शासन निर्णय क्र: शाशेअ-२०१४/प्र.क्र.१६५/४अे, दिनांक २८ ऑगस्ट, २०१४**
६. **केंद्र शासनाची क्र. १-७/२०१४-RFS-III दिनांक १६ जानेवारी, २०१५ रोजीची पत्रे. (तीन)**

**प्रस्तावना:**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्यात अवर्षण प्रवण शाश्वत शेती विकास कार्यक्रम राबविण्यात येत होता. सन २०१४-१५ पासुन केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना केली असुन काही योजना एकत्रित करुन अभियान म्हणुन राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर पुनर्रचनेमध्ये राष्ट्रीय सुक्ष्म सिंचन अभियान (NMMI), राष्ट्रीय सेंद्रीय शेती प्रकल्प (NPOF), राष्ट्रीय मृदा आरोग्य व सुपिकता व्यवस्थापन प्रकल्प (NPMSH&F) आणि कोरडवाहु शाश्वत शेती विकास कार्यक्रम (RADP) या सर्व योजना एकत्रितरित्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान म्हणून राबविण्याचे निश्चित केले आहे. या अभियानामध्ये पुढील घटकांचा समावेश करण्यात आला आहे. १. अवर्षण प्रवण क्षेत्र विकास (RAD) २. शेतीवरील पाणी व्यवस्थापन (OFWM) ३. मृदा आरोग्य व्यवस्थापन (SHM) व ४. वातावरण बदल आणि शाश्वत शेती: सनियंत्रण, रचना व संजालन (CCSAMMN).

संदर्भाधीन अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास (RAD) सन २०१४-१५ मध्ये राज्यात राबविण्यासाठी रु.४८१९.५५ लक्ष एवढ्या निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन अनुक्रमांक २ अन्वये पहिल्या हप्त्यापोटी रु.२५००.०० लक्ष एवढा निधी वितरीत केला आहे. सदर निधीतून संदर्भाधीन अनुक्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये अवर्षण प्रवण क्षेत्र विकास (RAD) राज्यात सन २०१४-१५ मध्ये राबविण्याकरीता सर्वसाधारण प्रवर्गासाठीचे अनुदान रु.१९००.०० लक्ष निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भाधीन अनुक्रमांक ५ अन्वये अनुसुचित जातीसाठी रु.४००.०० लक्ष व अनुसुचित जमातीसाठी रु.२००.०० लक्ष अशा एकुण रु.६००.०० लक्ष रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने अनुक्रमांक ६ येथील पत्रान्वये दुस-या हप्त्यापोटी सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.१३२५.०० लक्ष, अनुसूचित जमातीसाठी रु.१४०.०० लक्ष व अनुसूचित जातीसाठी रु.३५.०० लक्ष असा एकूण रु.१५००.०० लक्ष (रु. पंधरा कोटी फक्त) एवढा निधी राज्य शासनास वितरीत केला आहे. सदर निधीच्या कार्याक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास (RAD) हा घटक सन २०१४-१५ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाकडून दुसऱ्या हप्त्यापोटी प्राप्त रु.१५००.०० लक्ष (रु.पंधरा कोटी फक्त) एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. केंद्र शासनाने दुस-या हप्त्यापोटी वितरीत केलेल्या रु.१५००.०० लक्ष निधीचे संवर्गनिहाय वितरण खलीलप्रमाणे राहीलः-

| अ.क्र. | संवर्ग | रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|
| १. | **सर्वसाधारण** | **रु.**१३२५.०० |
| २. | **अनुसूचित जमाती** | **रु.**१४०.०० |
| ३. | **अनुसूचित जाती** | **रु.**३५.०० |
| | **एकूण** | **रु.१५००.००** |

३. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला रु.१५००.०० लक्ष (रु.पंधरा कोटी फक्त) एवढा निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१४-१५ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष:**

मागणी क्र. D-३

२४०१, पिक संवर्धन

१०९, विस्तार व प्रशिक्षण

०१- माहिती व प्रसारण

(०१)(५१)- अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (केंद्र हिस्सा)

(२४०१ ९५५४) ३३, अर्थसहाय्य

४. सदर योजना संदर्भाधीन अ.क्र.१ येथील शासन निर्णयातील तसेच केंद्र शासनाच्या संदर्भाधीन अ.क्र.३ येथील मार्गदर्शक सूचनांनूसार राबविण्यात यावी.

५. सदर योजनेच्या वार्षिक खर्चाचे लेखापरीक्षण करून सदरचा अहवाल व उपयोगिता प्रमाण पत्र केंद्र शासनास पुढील वर्षाच्या जून अखेर पर्यंत पाठविण्यात यावे.

६. या योजनेचा आर्थिक व भौतिक मासिक प्रगती अहवाल त्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत केंद्र शासनाला सादर होईल, याची दक्षता घ्यावी.

७. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राज्य नियंत्रक म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला निधी आहरीत व संवितरीत करण्याचे अधिकार कृषि आयुक्तालय स्तरावर सहाय्यक संचालक, लेखा-१, विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील लेखा अधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी, उपविभागीय कृषि अधिकारी व तालुका कृषि अधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४४/२०१५/व्यय-१ दि. १८ फेब्रुवारी, २०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व मा.अप़र मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२३१६४५३२७२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Madan Umesh M

Digitally signed by Madan Umesh M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Umesh M
Date: 2015.02.23 16:56:13 +05'30'

**(उ.म.मदन)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. मा.अ.मु.स. (कृषि) यांचे स्विय सहाय्यक
४. प्रधान सचिव(ग्रामविकास), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. प्रधान सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. प्रधान सचिव (रोहयो व जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,अकोला.
९. जिल्हाधिकारी (सर्व)
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
११.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.संचालक, महाराष्ट्र राज्य बीज प्रमाणीकरण यंत्रणा, अकोला
१३.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१४.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)

१५.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
१६.सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/सर्व मंडळ कृषि अधिकारी
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१९.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२०.संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२१.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२२.उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२३.उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२४.सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२५.निवडनस्ती.